आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री मत्स्यसंपदा योजनेकरीता निधी वितरण.

**लेखाशिर्ष (केंद्र हिस्सा-२४०५ ७७६८)**
**(राज्य हिस्सा-२४०५ ७७७७)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.७/ कार्यासन-६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनां : २४ मार्च, २०२२.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.०३.०२.२०२२ व दि.१७.०३.२०२२.
२) आदिवासी विकास विभाग, शा. नि.क्र. बीयुडी-२०२१/प्र.क्र. ७/कार्यासन-६, दि.१६.७.२०२१ व दि.२१.२.२०२२.
३) केंद्र शासन, पदुम मंत्रालय यांचे पत्र क्र. j-११७०१२/२९/२०२०-Fy, Dt.३०.९.२०२१.
४) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र.पूरक-११२१/प्र.क्र.१९५/पदुम-१४.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषी व पदुम विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री मत्स्यसंपदा या योजनेचा केंद्र हिस्सा रु.१४२.३७ लाख (रु.१०.३७.०० लाख (सन २०२०-२१ मधील प्रलंबित निधी) + रु.१३२.०० लाख (सन २०२१-२२ करीता प्राप्त प्रथम हप्ता)) व समरुप राज्य हिस्सा रु.९४.९१ लाख(६.९१+८८.००) इतका निधी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील उपलब्ध आर्थिक तरतुदींतून वितरीत करण्याबाबत पदुम विभागाकडून संदर्भाधीन क्र. ४ अन्वये सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २४०५, मत्स्यव्यवसाय मधील प्रधानमंत्री मत्स्यसंपदा योजनेसाठी सन २०२१-२२ च्या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदींतून वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार पुढीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व केंद्र / राज्य हिस्सा | बाब | सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पीय तरतूद | वितरीत तरतूद | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| प्रधानमंत्री मत्स्यसंपदा योजना | २४०५ ७७६८ (केंद्र हिस्सा ३६ टक्के) | ३३, अर्थसहाय्य | ६४७.६३ | १८९.६३ | १४२.३७ |
| | २४०१ ७७७७ (राज्य हिस्सा २४ टक्के) | | ४३१.७५ | १२६.४२ | ९४.९१ |
| | **एकूण** | | **१०७९.३८** | **३१६.०५** | **२३७.२८** |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.२३७.२८ लाख (अक्षरी रुपये दोन कोटी सदोतीस लाख अठ्ठावीस हजार फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, पदुम विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात मात्र फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१९०/व्यय-१४, दि.१६.०३.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२४१२३३०८७५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.03.24 13:28:23 +05'30'

( रविंद्र औटे )

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव ( पदुम ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त (मत्स्यव्यवसाय), चर्नीरोड, मुंबई.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
७. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
८. कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.